भगवान श्री विकट

नानाभेदमयी माया तत्रात्मा भेदवर्जित:!

अतो विकट संज्ञो यमात्माकारो गजानन:!     यामाऽत्माकारो

श्रीमुदगलपुराण ६/४३/३९

नूतन संवत्सरातील या प्रथम चतुर्थीच्या समस्त गणेश भक्तांना सादर वंदन पूर्वक हार्दिक शुभकामना नुतनवर्षाभिनंदन मागील लेखात आपण श्रीविकट चरित्राचा कथाभाग पाहिला आता त्यामागील गुढार्थ समजून घेण्याचा प्रयास करू.

विकट शब्दाचा नेमका शास्त्रीय अर्थ श्रीमुदगल पुराणकारांनी वरील शब्दात व्यक्त केला आहे. नानाविध भेदांनी युक्त असलेल्या मायेला शास्त्रात 'कट' असे म्हणतात. कट म्हणजेच माया, कट म्हणजे वाकडेपणा, कट म्हणजे अशुद्धता. त्याशब्दास  'वि' उपसर्ग लागतो. वि उपसर्गाचा एक अर्थ विलग होणे, विलीन होणे असा आहे. अर्थात ज्या शुद्ध रूपापासून माया विलग असते त्यास विकट म्हणतात. ज्या परमशुद्ध रुपात माया विलीन होते त्या परब्रह्मास विकट म्हणतात.

मायेला भेदमयी म्हणतात. आत्मा हा भेदवर्जित असतो. अत: या आत्मरूप गजाननास विकट म्हणतात.

भगवान श्री गणेशांच्या या विकट अवताराचे प्रगटीकरण कारण आहे 'कामासूर'. वास्तविक भारतीय संस्कृती ही एकमेव अशी सुंदर तम संस्कृती की जी 'कामाला' सुद्धा परमार्थ मानते. चतुर्विध परमार्थात अर्थ आणि काम यांनाही आपली संस्कृती सन्मानाने स्थान देते. फक्त त्या पूर्वी धर्म आणि नंतर मोक्ष असे कोंदण ठेवते. या कोंदणात असलेले अर्थ आणि काम रत्नांचे सौंदर्य धारण करतात.

काम हा पुरषार्थ  आहे. एक अत्यंत नैसर्गिक भावना आहे. फक्त तिचे प्रगटीकरण विवेकपूर्ण हवे. याच कारणाने श्रीमद भगवद गीतेत भगवान श्रीकृष्ण वर्णन करतात. 'धर्माविरुद्धं भूतेषु कामोस्मी भरतर्षभ !' हे अर्जुना धर्माला विरुद्ध नसलेला 'काम' म्हणजेच मीच आहे.

काम ही भगवंताची विभूती आहे. फक्त तो धर्माच्या विरुद्ध नसावा. तो धर्मसंमत असला. शास्त्रसंमत असला की तो पुरुषार्थ ठरतो. पण धर्म विरुद्ध झाला की असुर ठरतो. कथा नेमके हेच सांगत आहे.

योगायोग पहा काय अद्भुत आहे. कामाचे विभूती मत्व सांगणारे भगवान श्रीविष्णूच येथे कामासूर प्रगटणाचे कारण आहेत. देवी वृंदेच्या विरहात कामातुर झालेल्या श्रीविष्णुंच्या कामविव्हलतेचा परिणाम आहे कामासूर.

श्रीहरींची प्रेमभावना देवी लक्ष्मीला अधिष्ठान करून प्रगटली तर ती धर्मसंमत आहे. मात्र त्या प्रगटीकरणाचे माध्यम जर जलंधरपत्नी वृंदा ठरत असेल तर ते पाप आहे. देवी वृंदेच्या पतीव्रत्य भ्रष्टतेसाठी देवतांनीच श्रीहरींना प्रोत्साहित केले असले तरी त्यामागील उद्देश जगत्कल्याणाचा होता. श्रीहरींना वृंदेच्या प्रेमात पडायला कोणी सांगितले नव्हते. कर्तव्य आणि भावना यांच्या सरमिसळीने सर्व गडबड केली आहे.

त्यातही वृंदा पतीसह सती गेली. विषय तिथेही संपला असता. पण तसेही घडले नाही. श्रीहरी तिच्या चितास्थानी शोकग्रहत होऊन रुदन करीत बसले. तेथे तिच्या समागमाची आठवण काढत व्यथित होत बसले. ही व्यथा निरुपयोगी होती. आता वृंदेच्या प्राप्तीची कोणतीच संभावना नव्हती. असंभाव्य अप्राप्त अशा कामनेच्या पुर्तीची परिणती कामासुरातच होणार. असा काम आसुरीच ठरणार. आरंभी त्या कामग्रस्ताला आणि नंतर त्याच्याद्वारे इतरांनाही त्रासदायकच ठरणार. कथेत श्रीविष्णूंचे स्थान इतके व्यापक आहे की त्यांच्या व्यापकत्वाने त्याच्या कामजन्य विकृतीची व्याप्ती त्रिभुवनग्राही ठरली आहे.

सामान्याचा अयोग्य,अशास्त्रीय काम त्याच्या बायको, मुले, नातेवाईक, सगेसोयरे यांच्यासाठी क्लेशदायी ठरू शकेल. श्रीहरींच्या अयोग्य कामाने अखिल जगतालाच वेठीला धरले. तो सगळ्या ब्रह्मांडाच्या क्लेशाचे कारण ठरला.

सगळ्या देवता त्या कामासमोर पराजित होतात. बरोबरच आहे. कामासुरासमोर अनैतिक चारीत्र्यासमोर व्यक्तिमत्वाचे अन्य सकल देदीप्यमान गुणही काळवंडूनच जात असतात. त्या सगळ्या गुणांचे कौतुक तोवरच असते जोवर तुमचे चारित्र्य संपन्न असते. चारीत्र्यहीनता अन्य गुणांचा मृत्युपंथच ठरतो. सगळ्या 'दैवी' बाबी कामासुरासमोर हतप्रभ ठरतात.

मग उपाय काय? उपाय एकच. श्रीगुरू शरणता श्रीगुरुही कोण भेटले तर महागाणपत्य भगवान श्रीमुदगल महाराज. त्यांचे नावच किती सुंदर? 'मुद्गल' मुद म्हणजे आनंद. ज्याच्या प्रत्येक कृतीतून हा आनंद गळतो, ओसंडून वाहतो ते मुदगल.

मुद शब्दाचा नेमका अर्थ आहे 'जे आहे त्यात समाधान मानन्याने निर्माण होणारी प्रसन्नता.' मुद 'आहे'. त्याचा विचार करतो तर काम 'नाही' त्याचा. जे मिळाले नाही, जे मिळत नाही, जे मिळण्याची शक्यता नाही त्याचीच तर कामना असते. अपेक्षा, हाव या अप्राप्तीचीच असते. उलट मुदचा संबंधच प्राप्तीशी आहे. 'प्राप्त हा पर्याप्त हे!' ही भूमिकाच मुदाचा आधार आहे.

जगतातील कशाचीही प्राप्ती नसतेच. ते फारतर एकत्रीकरण असते. आज आपल्या जवळ असणारा पदार्थ हा कालपर्यंत आपल्या जवळ नव्हता आणि कधीतरी आपल्या जवळ नसणार आहे. वेगळ्या शब्दात त्या पदार्थाच्या आजच्या प्राप्तीला नेमका अर्थ किती? आजही प्राप्तीही मर्यादितच आहे. वेगळ्या शब्दात ही प्राप्ती कधीही कधी अप्राप्तीतच परिवर्तित होणार आहे. मग प्राप्ती कशाची हवी?

प्राप्ती हवी नित्यप्राप्तीचीच आणि नित्यप्राप्त काय आहे तर एकमेवाद्वितीय श्रीगणराज प्रभू. कारण ते एकच नित्य आहेत. त्यांची प्राप्तीच नित्यप्राप्ती आहे. ही नित्यप्राप्तीच मोदाचे कारण आहे. ही नित्यप्राप्ती घडवून देतात ते 'मुदगल'.

अनित्य प्राप्तीचा हव्यास कामासूर निर्माण करतो तर नित्यप्राप्तीच्या उपासनेने विकट प्रादुर्भाव होतो. श्रीहरी भस्मीभूत झालेल्या वृंदेच्या आसक्तीत कामातुर होतात आणि परिणाम होतो कामासूर प्रगटीकरणात. मग तो सगळ्या विश्वाचे हाल करतो. त्या कामास तेच नियंत्रित करू शकतात जे 'विकट' असतात.

सकल अनित्य बाबी या मायेच्या क्षेत्रात मोडतात. तीच अनित्य आहे. तिचा विषयच अनित्य आहे. तिची प्राप्तीही अनित्यच अत: तिच्या परिणामातून नित्यत्वाची संभावनाच नाही. ती 'कट' पूर्णच आहे. तिचा विलय ज्या परब्रह्माठायी होतो त्यांना श्रीविकट म्हणतात.

नमो श्री विकट विनायकाय! जय गणेश!